राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY)
सन २००९-१० मध्ये विदर्भातील
चार जिल्ह्यांत बोडी दुरुस्ती/नुतनीकरण
कार्यक्रमास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.राकृयो-२००९/प्र.क्र.६४/जल-१२
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०१०

संदर्भ :-

१) शासन निर्णय, कृषि प पदुम विभाग, क्र.समिती-२००७/प्र.क्र.१/राकृवियो कक्ष, दि.२० सप्टेंबर,२००७.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. राकृयो- २००८/प्र.क्र.११३/जल-१२,
दि.१५ जानेवारी, २००९व दि. २० मार्च, २००९
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. राकृवि -२००९/प्र.क्र.७८/राकृवियो कक्ष, दि.१ ऑगस्ट, २००९
४) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. मग्रारो-२००९/ प्र.क्र.१६६/मग्रारो-१, दि. २० जानेवारी, २०१०
५) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.मृदसं/मृद-४/बोडी नुतनीकरण/६९०/२०१०, दि. १ फेब्रुवारी, २०१० चे पत्र.

**प्रस्तावना** :-

राष्ट्रीय विकास परिषदेने (NDC) पारीत केलेल्या ठराव क्र.५३ नुसार अकराव्या पंचवार्षिक योजनेत ४ टक्के कृषि विकासाचे उद्दिष्ट ठरविले आहे. हे लक्षात घेऊन केंद्रीय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) जाहीर केलेली आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत केंद्र शासनाने प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सुचनेनुसार मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन दि.२० सप्टेंबर,२००७ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समिती गठीत करण्यात आलेली आहे. या समितीच्या दि.११ जून,२००९ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सन २००९-१० मध्ये विदर्भातील भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या ४ जिल्ह्यांत "बोडी दुरुस्ती/नुतनीकरण" कार्यक्रमास मान्यता दिली असून, या करिता कृषी व पदुम विभागाच्या संदर्भ क्र. ३ मधील दि. १ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यतेसह रु.५.०० कोटी निधी मंजूर केला आहे.

राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीच्या वरील मान्यतेनुसार राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत "बोडी दुरुस्ती/नुतनीकरण" हा कार्यक्रम सन २००९-१० मध्ये विदर्भातील ४ जिल्ह्यांत राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सन २००९-१० मध्ये विदर्भातील भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या ४ जिल्ह्यांत रु. ५.०० कोटी इतक्या निधीचा "बोडी दुरुस्ती/ नुतनीकरणा" चा कार्यक्रम राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. याअंतर्गत एकूण १००० बोडी दुरुस्तीचे उद्दिष्ट राहिल.

२. सन २००९-१० मध्ये बोडी दुरुस्तीचे जिल्हानिहाय भौतिक व आर्थिक उदिष्ट खालील प्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | भौतिक उद्दिष्ट | आर्थिक उद्दिष्ट (रु.कोटी) |
|---|---|---|---|
| १ | भंडारा | ३०० | १.५० |
| २ | गोंदिया | १०० | ०.५० |
| ३ | चंद्रपूर | ३०० | १.५० |
| ४ | गडचिरोली | ३०० | १.५० |
| | **एकूण** | १००० | ५.०० |

बोडींच्या लांबी व उंचीनुसार बोडीचा खर्च अवलंबून असल्याने वर नमूद भौतिक उद्दिष्ट साध्य होताना त्यात वाढ/ घट होण्याची शक्यता आहे. याबाबत सविस्तर सूचना संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत निर्गमित करण्यात याव्यात.

३. उपरोक्त परिच्छेदात मंजूर केलेला कार्यक्रम संदर्भाधिन शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. राकृयो-२००८/प्र.क्र.११३/जल-१२, दि. २० मार्च, २००९मध्ये नमूद केलेल्या खालील अटींच्या अधिन राहून राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

३. (१) **लाभार्थ्यांची पात्रता** -

१) लाभार्थी शेतकऱ्यांची स्वत:च्या मालकीची शेतजमीन असावी.
२) त्यांच्या भातशेतीत स्वत:च्या मालकीची जुनी बोडी असावी.
३) बोडीमध्ये पाण्याची पुरेशा प्रमाणात आवक असावी.
४) बोडीखाली भिजणाऱ्या क्षेत्रात बोडी लगतचे क्षेत्र लाभार्थ्यांच्या मालकीचे असावे.
५) लाभार्थी शेतकरी हा शिल्लक राहणारे अतिरिक्त पाणी लगतच्या शेतकऱ्यांना सिंचनासाठी नि:शुल्क देईल याची संमत्ती देणारा असावा.

३.(२) **लाभार्थी निवड खालील प्राथमिकतेनुसार करावी** -

१) दारिद्रय रेषेखालील (बीपीएल) - शेतकऱ्यांमधील सर्वात शेवटच्या शेतकऱ्याची निवड प्रथम या पध्दतीने (अंत्योदय मोड)
२) अनुसूचित जाती/जमाती शेतकरी
३) अल्प व अत्यल्प भूधारक शेतकरी (राज्य शासनाने ठरवून दिलेल्या निकषानुसार)
४) सर्वसाधारण प्रवर्गातील शेतकरी

३(३) **लाभार्थी निवड समिती -**

बोडी दुरुस्तीकरिता प्राप्त अर्जदारापैकी पात्र लाभार्थी शेतक-यांची निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे तालुकानिहाय व जिल्हानिहाय समित्या स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

अ) **तालुकास्तरीय समिती**

| | | |
|---|---|---|
| १) तहसिलदार | - | अध्यक्ष |
| २) गटविकास अधिकारी | - | सदस्य |
| ३) उप अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिकस्तर) | - | सदस्य |
| ४) तालुका कृषि अधिकारी | - | सदस्य सचिव |

ब) **जिल्हास्तरीय समिती**

| | | |
|---|---|---|
| १) जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| २) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. | - | सदस्य |
| ३) कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिकस्तर) | - | सदस्य |
| ४) जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | - | सदस्य सचिव |

वरीलप्रमाणे तालुकास्तरीय समितीने आलेल्या अर्जाची छाननी करुन, प्राधान्यक्रम ठरवून बोडीचे काम हाती घेण्याची शिफारस जिल्हास्तरीय समितीकडे करावी आणि जिल्हास्तरीय समितीने या शिफारशीच्या अनुरोधाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेखाली लाभार्थी शेतक-यांच्या यादीस मान्यता प्रदान करावी.

३.(४) **जिल्ह्याच्या उद्दिष्टांची विभागणी** -

"प्रत्येक जिल्ह्याला दिलेल्या भौतिक आणि आर्थिक उद्दिष्टांची तालुकानिहाय विभागणी सन २००१ च्या लोकसंख्येवर आधारित करण्यात यावी. या निकषानुसार उद्दिष्टाचे वितरण जिल्हास्तरीय समितीमार्फत करण्यात यावे."

३.(५) **बोडीचे आकारमान व आर्थिक मापदंड** :

बोडी दुरुस्तीसाठी मंजूर मापदंड व अनुज्ञेय अनुदान याबाबत नियोजन विभाग (रोहयो) यांच्या क्र.मग्रारो-२००९/प्र.क्र.१६६/मग्रारो-१, दि.२०.१.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेले सुधारीत तांत्रिक व आर्थिक मापदंड लागू राहतील.

३.(६) **अनुदान वितरण** -

(i) बोडी दुरुस्तीचा कार्यक्रम शेततळी बांधण्याच्या कार्यक्रमाच्या धर्तीवर राबविण्यात येणार असल्याने बोडी दुरुस्तीचे काम लाभार्थ्यांने स्वत: करावयाचे आहे.

(ii) बोडी दुरुस्तीचे काम पूर्ण झाल्यावर अनुज्ञेय अनुदानाची रक्कम संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी मोजमाप केल्यानंतर **क्रॉस धनादेशाद्वारे संबंधीत लाभार्थ्यांना अदा करावी.**

४. **अंदाजपत्रकास मान्यता:-**

लाभार्थी शेतक-यांची निवड झाल्यानंतर त्याच्या शेतातील बोडींचे सर्व्हेक्षण करुन प्रचलित मार्गदर्शक सूचनांनुसार नुतनीकरणाचे अंदाजपत्रक तयार करावे. अंदाजपत्रकास सक्षम अधिका-यांनी तांत्रिक मान्यता दयावी व या मान्यतेची एक प्रत संबंधित लाभार्थीस देऊन एक महिन्याच्या आत काम पूर्ण करण्याच्या सूचना देण्यात याव्यात. या मुदतीत त्यांनी काम सुरु केले नाही तर सदरहू अंदाजपत्रक रद्द करुन पुढील पात्र अर्जदार शेतक-यांस लाभ देण्यात यावा.

५. सन २००९-१० मध्ये बोडी दुरुस्तीचा कार्यक्रम राबविण्यासाठी मंजूर निधी वितरणाचे आदेश कृषी विभागामार्फत स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. तोपर्यंत मंजूर केलेल्या जिल्हानिहाय उद्दिष्टानुसार बोडींचे सर्वेक्षण, पात्र लाभार्थ्यांची निवड प्रक्रीया व त्याकरिता आवश्यक तांत्रिक व प्रशासकीय मान्यता, मंजूरी पत्र संबंधित लाभार्थ्यांना वितरित करणे इत्यादीबाबत तातडीने कार्यवाही सुरु करण्याबाबत आयुक्त (कृषी) यांनी सर्वसंबंधित क्षेत्रिय अधिका-यांना सूचना द्याव्यात.

६. **योजनेचे संनियंत्रण:-**

सन २००९-१० मध्ये राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत मंजूर केलेला बोडी दुरुस्तीचा कार्यक्रम कालबध्दरित्या पूर्ण करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषी) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहिल. याकरिता या कार्यक्रमाचे वेळेपत्रक व सर्व समावेशक मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रिय अधिकारी / कर्मचारी यांना तातडीने निर्गमित कराव्यात. बोडी दुरुस्तीचा कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी तांत्रिक व अनुषंगिक बाबींची पूर्तता होईल याची पूर्ण दक्षता घेण्यात यावी.

या कार्यक्रमाचे समन्वय व संनियंत्रणाची जबाबदारी संबंधीत नोडल अधिका-याची राहिल. बोडी दुरुस्ती/ नुतनीकरण कार्यक्रमात झालेल्या आर्थिक व भौतिक प्रगतीचा अहवाल दरमहा आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावा.

७. सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेली राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीने दि. ११ जून, २००९ च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००२१५१४३८५४००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रेखा भिडे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री,(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव

D:\sandip\JAL-12 2010\GR 64 2009.lwp

सर्व मा. मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्यस्तरीय जलसंधारण सल्लागार परिषद.
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता,लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे,(स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक,सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व मुख्य वनसंरक्षक,
सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपायुक्त (विकास),
कार्याध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
नियोजन विभाग/ वित्त विभाग/ कृषी विभाग (राकृवियो)
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (जलसंधारण उपविभाग), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय. निवड नस्ती जल-१२

D:\sandip\JAL-12 2010\GR 64 2009.lwp